**नागरी नोंदणी कार्यक्रमांतर्गत राज्यस्तरीय आंतर विभागीय समन्वय समिती दिनांक २७.०१.२०१७ रोजीच्या बैठकीतील निर्णयाच्या अंमलबजावणीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१६/प्र.क्र.४६/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १७ जून, २०१७

**वाचा:-** नगर विकास विभाग शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४६/नवि-२०,दि.१२.०२.२०१६

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाचे जन्म-मृत्यू अधिनियम,१९६९ व महाराष्ट्र जन्म-मृत्यू नियम,२००० मधील वैधानिक तरतुदीनुसार महाराष्ट्र राज्यात जन्म-मृत्यू घटनांची नोंदणी केली जात होती. नगर विकास विभाग शासन निर्णय दिनांक १२.०२.२०१६ नुसार नागरी भागात केंद्र शासनाने विकसित केलेल्या संगणक प्रणालीमध्ये राज्यात दिनांक ०१.०१.२०१६ पासून जन्म-मृत्यू घटनांची नोंदणी करुन जन्म-मृत्यू प्रमाणपत्र वितरित करण्याबाबत सर्व महानगरपालिका व नगरपालिका यांना तात्काळ अंमलबजावणीबाबत आदेश देण्यात आले आहेत. नागरी नोंदणी कार्यक्रमाअंतर्गत राज्यस्तरीय आंतर विभागीय समन्वय समितीची सभा गुरुवार दिनांक २७.०१.२०१७ रोजी मा. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य यांचे दालनात पार पडली. सदर बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने नागरी स्थानिक संस्थांना निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन परिपत्रक :-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर सर्व नागरी स्थानिक संस्थांनी पुढीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१) शासन परिपत्रक नगर विकास विभाग दिनांक १२/०२/२०१६ अन्वये निर्देशित केल्यानुसार शहरी भागात ०१ जानेवारी २०१६ पासून सुरु करण्यात आलेल्या केंद्र सरकारच्या नविन संगणक प्रणालीचा माहिती भरण्यासाठी वापर करावा.

२) दि. ०१.०१.२०१६ पासून शहरी भागात केंद्र सरकारच्या संगणक प्रणालीत जन्म मृत्युच्या नोंदी घेऊन त्यानुसार प्रमाणपत्र देणे बंधनकारक आहे. “सदर संगणक प्रणालीतून ऑनलाईन पध्दतीने प्राप्त केलेले प्रमाणपत्र हे सर्व केंद्र शासनाच्या व राज्य विभागांनी ग्राह्य धरावे व मुळ स्वाक्षरीसह प्रमाणपत्राचा आग्रह धरु नये,” या केंद्र शासनाच्या निर्देशांचे पालन करावे.

३) शासन परिपत्रक, नगर विकास विभाग, दिनांक १२/०२/२०१६ नुसार मुबई महानगरपालिका वगळता इतर महानगरपालिका, नगरपरिषद, नगरपंचायतींनी सन २०१६ पुर्वीच्या जन्म-मृत्यू नोंदणीची माहिती अद्यापही केंद्र शासनास सादर केलेली नाही. सदर माहिति तात्काळ सादर करण्यात यावी.

४) आरोग्य संस्थेत होणारा मृत्युच्या कारणांची माहिती संबधित वैद्यकीय अधिकारी यांनी केंद्र सरकारच्या नमुना क्र. ४ मध्ये मृत्यूचे कारण नमुद करुन संबंधित माहिती उपसंचालक, आरोग्य सेवा, आमाजीआ, पुणे या कार्यालयास सादर करावे. काही मृत्यू घरी घडतात अशा रुग्णाचा मृत्यूपुर्व उपचार वैद्यकीय अधिकारी देत असल्यास त्यांना त्याच्या मृत्यूचे कारण माहिती असते अशा मृत्यूबाबतीत नमुना क्र. ४ अ मध्ये मृत्यूचे कारण लिहून उपसंचालक, आरोग्य सेवा, आमाजीआ, पुणे या कार्यालयास सादर करावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१७०६१७१४०६५७०७२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdbaa1d64146913669652db09801ad2747641d9f84fcf576e55f7050a8df530d, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.06.17 14:05:07 +05'30'

( ज. ना. पाटील )
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्माननीय विधानसभा/ विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा. लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
९) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
१०) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
११) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१२) उपसंचालक, आरोग्य सेवा (आमाजीआ), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायत (सर्व)
१४) नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
१५) निवडनस्ती.